प्रशासकीय मान्यता
गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना २०१६-१७

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शेअवि-२०१६/प्र.क्र.१८४/११-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २५ नोव्हेंबर, २०१६

वाचा -

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दि. १९.८.२००४
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे,दि.५.१.२००५
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००७/प्र.क्र.२३२/११-अे, दि. १३.७.२००७
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००९/प्र.क्र.२६८/११-अे, दि.४.१२.२००९
५) शासन शुद्धीपत्र, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००९/प्र.क्र.२६८/११-अे, दि.५.३.२०११
६) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२०१४/प्र.क्र.६९/११-अे, दि.३०.१०.२०१४
७) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२०१६/प्र.क्र.१५९/११-अे, दि. २६.११.२०१५
८) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२०१६/प्र.क्र.१५९/११-अे, दि. २६.११.२०१५

प्रस्तावना -

शेती व्यवसाय करताना होणारे अपघात, वीज पडणे, पूर, सर्पदंश, विंचूदंश, विजेचा शॉक बसणे इ. नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे अपघात, रस्त्यावरील अपघात, वाहन अपघात, तसेच, अन्य कोणत्याही कारणांमुळे होणारे अपघात, यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढवतो किंवा काहींना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस झालेल्या अपघातामुळे कुटुंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होवून अडचणीची परिस्थिती निर्माण होते. अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस/त्यांच्या कुटुंबास आर्थिक लाभ देण्याकरिता कोणतीही स्वतंत्र विमा योजना नसल्यामुळे, शासनाने राज्यात “शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना” ही योजना सन २००५-०६ पासून कार्यान्वित केली . सन २००९-१० पासून सदर योजनेचे नामाभिधान “शेतकरी जनता अपघात विमा योजना” असे करण्यात आले तर सन २०१५-१६ पासून सदर योजना गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना या नावाने राबविण्यात येत आहे. सदर विमा योजना रु.२.०० लाख इतक्या विमा संरक्षणासह राबविण्यात येत आहे.

सदर योजनेचे कल्याणकारी स्वरुप विचारात घेवून ही योजना सन २०१६-१७ यावर्षीही राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शेती व्यवसाय करताना होणारे अपघात, वीज पडणे, पूर, सर्पदंश, विंचूदंश, विजेचा शॉक बसणे इ. नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे अपघात, रस्त्यावरील अपघात, वाहन अपघात, तसेच, अन्य कोणत्याही कारणांमुळे होणारे अपघात, यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढवतो किंवा काहींना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस झालेल्या अपघातामुळे कुटुंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होवून अडचणीची परिस्थिती निर्माण होते. अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस/त्यांच्या कुटुंबास आर्थिक लाभ देण्याकरिता "गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना," ही विमा योजना सन २०१६-१७ मध्ये रु.२.०० लाख विमा संरक्षणासह राबविण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे. संबंधित विमा कंपनीला विमा हप्त्याचे प्रदान केल्यापासून १२ महिन्याच्या कालावधीकरिता, उपरोक्त दि.४.१२.२००९ चा शासन निर्णय आणि दि.५.३.२०११ च्या शासननिर्णय शुध्दीपत्रकातील अटी व शर्तीसह, तसेच, खालील अटींवर, विमा योजना चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

(अ) उपरोक्त दि.१० ऑगस्ट, २०१० च्या शासन निर्णयान्वये सन २०१०-११ ते सन २०१२-१३ या तीन वर्षांच्या कालावधीसाठी सुमारे एक कोटी सदतिस लाख इतकी शेतकरी संख्या निश्चित करण्यात आली आहे. सदर शेतकरी संख्या २०१६-१७ या वर्षासाठीही ग्राह्य धरण्यात येत आहे. त्यानुसार, प्रस्तावनेत नमूद कारणांमुळे होणारे अपघाती मृत्यू किंवा अपंगत्व यासाठी राज्यातील महसूल विभागाकडील ७/१२ वरील नोंदीप्रमाणे १० ते ७५ वर्षे वयोगटातील खातेदार शेतकऱ्यांच्यावतीने, योजनेच्या मंजूर कालावधीकरिता, प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे विमा पॉलिसी उतरविण्यात येत असून खालीलप्रमाणे नुकसान भरपाई निश्चित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अपघाताची बाब | नुकसान भरपाई |
|---|---|---|
| १ | अपघाती मृत्यू | रु.२,००,०००/- |
| २ | अपघातामुळे दोन डोळे अथवा दोन अवयव निकामी होणे | रु.२,००,०००/- |
| ३ | अपघातामुळे एक डोळा व एक अवयव निकामी होणे | रु.२,००,०००/- |
| ४ | अपघातामुळे एक डोळा अथवा एक अवयव निकामी होणे | रु.१,००,०००/- |

(ब) योजना कालावधीत संपूर्ण दिवसासाठी म्हणजेच विहित कालावधीतील प्रत्येक दिवसाच्या २४ तासांसाठी ही योजना लागू राहील. या कालावधीत शेतकऱ्याला केंव्हाही अपघात झाला किंवा अपंगत्व आले तरीही तो या योजनेअंतर्गत लाभासाठी पात्र राहील.

(क) या योजनेंअंतर्गत शेतकऱ्यांनी किंवा त्यांच्या वतीने अन्य कोणत्याही संस्थेने विमा कंपन्यांकडे स्वतंत्ररित्या विमा हप्त्याची रक्कम भरण्याची गरज नाही. तसेच, यापूर्वी शेतकऱ्यांनी अथवा त्यांच्या वतीने

अन्य कोणत्याही संस्थेने कोणतीही वेगळी विमा योजना लागू केली असल्यास अथवा विमा उतरविला असल्यास त्याचा या योजनेशी काहीही संबंध असणार नाही. या योजनेंतर्गत मिळणारे लाभ स्वतंत्र असतील.

२. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे २०४/१४३१, दि. १९.११.२०१६ व २६९/२०१६/व्यय-१, दि. २५.११.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२५१४४९२३०६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2016.11.25 14:51:18 +05'30'

**( श.बा.पावसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
६) मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
७) सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
८) सर्व मा.विधानसभा सदस्य
९) सर्व मा. विधानपरिषद सदस्य
१०) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई ३२
११) अपर मुख्य सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१२) अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१३) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१६) प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१७) सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती ) प्रसिध्दीच्या विनंतीसह
१९) सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
२०) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२१) सर्व जिल्हाधिकारी
२२) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२३) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
२४) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
२५) सर्व जिल्हा परिषदांचे, जिल्हा कृषि विकास अधिकारी
२६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा ), मुंबई.
२७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई
२८) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा ), नागपूर
२९) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
३१) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
३२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
३३) दि.ओरिएंटल इन्शुरन्स कंपनी लि.,मे.फेअर टॉवर, पुणे-मुंबई रोड, वाकडेवाडी, शिवाजीनगर, पुणे ५
३४) जायका इन्शुरन्स ब्रोकरेज प्रा.लि. दुसरा मजला, जायका बिल्डींग, कमर्शिअल रोड, सिव्हील लाईन, नागपूर ४४० ००१
३५) ग्रंथालय प्रमुख, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती)
३६) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-
३७) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३८) सर्व तहसिलदार
३९) सर्व उप विभागीय कृषि अधिकारी
४०) सर्व तालुका कृषि अधिकारी
४१) सर्व उपसचिव /अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४२) सर्व मंत्रालयीन विभाग
४३) सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्ष यांची मध्यवर्ती कार्यालये
४४) निवड नस्ती, कार्यासन ११-अे.